.20110111160029001

महानगरपालिकांच्या [मुंबई महानगरपालिका वगळून] विकास आराखड्यातील नगर विकास योजनांना शासनाकडून २३.३३ टक्के प्रमाणे द्यावयाचे अनुदान.

---

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक: पीएमसी-३०८९/२५/प्र.क्र. ६/८९/नवि-२२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक १५ मार्च, १९९०.

## शासन निर्णय

महानगरपालिकांच्या विकास आराखड्यामध्ये समाविष्ट असलेल्या नगर विकास योजनांना शासकीय अनुदान उपलब्ध करून देण्यासंबंधीचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. या योजनांवरील संपूर्ण खर्च महानगरपालिकांतर्फे त्यांच्या निधीतून करण्यात येत असे. परंतु, असे निदर्शनास आले की, हा संपूर्ण खर्च महानगरपालिकांना करणे शक्य होत नाही. या बाबीचा विचार करून शासनाने असा निर्णय घेतला आहे की, मुंबई महानगरपालिका क्षेत्र वगळता इतर क्षेत्रांमध्ये महानगरपालिकांच्या मंजूर केलेल्या विकास आराखड्यात समाविष्ट करण्यात आलेल्या विकास योजनांसाठी शासनाकडून संबंधित महानगरपालिकेला २३.३३ टक्के एवढे शासकीय अनुदान मंजूर करण्यात यावे. उरलेले ७६.६७ टक्के निधीची रक्कम संबंधित महानगरपालिकांनी अंतर्गत व्यवस्था करून उभारावयाची आहे. या योजनांना जिल्हा नियोजन व विकास मंडळांनी त्यांच्याकडे उपलब्ध असलेल्या नियत वार्षिक योजनेतून निधीची तरतूद करावयाची आहे. अशा योजना जिल्हास्तरीय योजना म्हणून समजण्यात येऊन त्यांचा विचार व निवड संबंधीत जिल्हा नियोजन व विकास मंडळाने करावयाची आहे.

२. या योजनांना शासनातील नगर विकास विभागातर्फे प्रशासकीय मंजुरी व अनुदानाला मंजूरी देण्यात येईल. संबंधीत जिल्हा नियोजन व विकास मंडळाने अशा विकास योजनेची निवड केल्यानंतर संबंधित महानगरपालिकेने त्या विकास योजनेसाठी नकाशे व अंदाज तयार करावेत व योजनेचा प्रस्ताव शासनाकडे प्रशासकीय मान्यतेसाठी सादर करावा. शासनाकडून योजनेला प्रशासकीय मान्यता मिळाल्यानंतर अशी मंजूर झालेली योजना महानगरपालिकेतर्फे कार्यान्वित करण्यास महानगरपालिकेच्या निधीतून हाती घेण्यात यावी. त्यानंतर शासनातर्फे अनुदानाची रक्कम टप्प्याटप्प्याने मंजूर करण्यात येईल अशी तरतूद योजना कार्यान्वित करण्यास हाती घेतल्यानंतरच्या वर्षापासून योजनेवर महानगरपालिकेकडून झालेला खर्च व संबंधित लेखाशिर्षाखाली उपलब्ध असलेली तरतूद विचारात घेऊन करण्यात येईल.

३. हा शासन निर्णय नियोजन विभागाच्या व वित्त विभागाच्या सहमतीने वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक: एसई-५३६, दिनांक ९ मार्च, १९९० नुसार निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

स्ही. पी. राजा,
महाराष्ट्र शासनाचे सह सचिव.

प्रति,

आयुक्त, महानगरपालिका, ठाणे, पुणे, पिंपरी-चिंचवड, नागपूर,
सोलापूर, कोल्हापूर, औरंगाबाद,
प्रशासक, महानगरपालिका, कल्याण, नाशिक, अमरावती,
विभागीय आयुक्त,
सर्व जिल्हाधिकारी,
महालेखाकार-१, महाराष्ट्र राज्य, मुंबई [अकौंटस् अँड एन्टायटलमेंट],
महालेखाकार-२, महाराष्ट्र राज्य, नागपूर [अकौंटस अँड एन्टायटलमेंट],
जिल्हाधिकारी व सदस्य सचिव, जिल्हा नियोजन विकास मंडळ,
पुणे, ठाणे, नाशिक, कोल्हापूर, नागपूर, औरंगाबाद, सोलापूर व
अमरावती,
नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई [योजना-८],
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
संचालक, नगर रचना, पुणे,
उप संचालक, नगरपालिका प्रशासन, नवीन प्रशासन भवन, मुंबई,
राज्यातील सर्व नगरपालिका / जिल्हापरिषदा,
कार्यासन अधिकारी, नवि-४, १३, १४, १५, २३, २४, २५, २६ व ३१,
निवड नस्ती.

एच-१२६४[२०००-३-२०]-१३.

-63-

Municipal Corporations (except Bombay)

Financial assistance to-for implementing their Development Plan Schemes -

GOVERNMENT OF MAHARASHTRA
Urban Development Department,
Resolution No. PMC-3089/25/CR-6/UD-22,
Mantralaya, Bombay-400 032, Dated the 15th March 1990.

## RESOLUTION

The question of giving grant-in-aid to the Municipal Corporations for the Schemes included in their Development Plans was under consideration of the Government for some time. The entire expenditure on these schemes has so far had to be incurred by the Corporations from their own funds. It has, however, been noticed that the Municipal Corporations are not in a position to bear the entire expenditure on such schemes. Taking this fact into account, the Government has now decided to provide 23.33% of the total expenditure as grant-in-aid to the concerned Municipal Corporations (excluding Bombay Municipal Corporation) for implementation of development schemes included in their sanctioned development plans. The remaining amount of 76.67% required for such development schemes has to be raised by the Municipal Corporation concerned from its own resources. The funds towards the grant-in-aid are to be provided by the District Planning and Development Council concerned from out of its annual plan allocations. These schemes are treated as District level Schemes and will, therefore, be considered and selected by the District Planning and Development Council concerned.

2. The administrative approval to such schemes and sanction for the release of grant-in-aid will be given by the government in Urban Development Department. On selection of schemes by the District Planning and Development Council concerned, the Municipal Corporation should prepare plans and estimates for such approved development schemes and submit the proposal to the Government for according administrative approval to the same. After administrative approval by the Government, the Municipal Corporation will take up the sanctioned schemes for execution from its own funds. The Government will then provide for amount of grant-in-aid admissible to the scheme in instalments. This provision for grant-in-aid will be made in the subsequent year after commencement of execution, taking into account the expenditure incurred by the Municipal Corporation and the availability of funds under the relevant Budget Head.

3. This Government Resolution issues in concurrence of the Planning and Finance Department vide its un-official reference No.SE/536, dated 9th March 1990.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

V.P. RAJA,
Joint Secretary to Government.

To

All Municipal Corporations (except Bombay),
All Divisional Commissioners,
All Collectors of Districts,
The Accountant General, Maharashtra State- I, Bombay,
The Accountant General, Maharashtra State-II, Nagpur,
The Planning Department (Yojana-8), Mantralaya, Bombay,
The Finance Department, Mantralaya, Bombay,
The Director, Town Planning, Pune,
Deputy Director of Municipal Administration,
All Municipal Councils and Zilla Parishads,
The Collector and Member-Secretary, District Planning and Development Councils, Pune/Thane/Nashik/Kolhapur/Nagpur/Aurangabad/Solapur and Amravati,
All Desks in Urban Development Department, Mantralaya, Bombay.

*********
*********

H-1264(2000-3-90)-2a